# संत

वाहवा साहेबजी । सद्गुरुलाल गुसाईजी
लाल बीज मो उदीला काला, औठ
पिठसो निला ।
पीत उन्मनी भ्रमर गुंफा रस झुला बाला ।
सहस्त्र दल मो अलख लिखाये,
आज लौ परमाना ।
जहां तहा साधू, दसवा आप ठिकाना ।
सदगुरु चेले दोनो बराबर,
येक देशमो भाई ।
एकसे ऐसे दरसन पायो महाराज मुक्ताई ।

मुंगी उडाली आकाशीं
। तिणें गिळीलें सूर्याशीं ॥ १ ॥
थोर नवलाव जाहला । वांझे पुत्र
प्रसवला ॥ २ ॥
विंचु पाताळाशी जाय । शेष
माथां वंदी पाय ॥ ३ ॥
माशी व्याली घार
झाली । देखोन मुक्ताई
ली ॥ ४ ॥

देउळाच्या कळशीं नांदे एक
ऋषी । तया घातली पुशी योगेश्वरीं ॥ १ ॥
दिवसा चांदिणें रात्रीं पडे उष्ण । कैसेंनी
कठिण तत्त्व जालें ॥ २ ॥
ऋषी म्हणे चापेकळिकाळ
पैं कांपे । प्रकाश पिसे
मनाच्या धारसे एक होय ॥ ३ ॥
एकट एकलें वायांचि
पै गुंफलें । मुक्त पैं विठ्ठलें सहज असे ॥ ४ ॥
वैकुंठ अविट असोनि प्रकट । वायांचि
आडवाट मुक्ताई म्हणे ॥ ५ ॥



# संत मुक्ताबाई

मुक्तामुक्त दोन्ही आईक तो
कर्णीं । हरिनाम वर्णी सदा काळ ॥ १॥
नाहीं काळ तेथें आम्हां वेळ कैची ।
हरिनामछंदाची गोडी थोरी ॥ २ ॥
नाना विघ्नबाधा नाईकों आम्हीं कदां ।
निरंतर धंदा रामकृष्ण ॥ ३ ॥
मुक्तपणें मुक्त
मुक्ताई रत । हरिनाम सेवीत
सर्वकाळ ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

नाम मंत्रें हरि निज दासां पावे ।
ऐकोनी घ्यावें झडकरी ॥ १ ॥
सुदर्शन करीं पावे लवकरी । पांडवां
साहाकारी श्रीकृष्ण रया ॥ २ ॥
निजानंद दावी उघडे पै
वैकुंठ । नामेंचि प्रगट आम्हांलागीं ॥ ३ ॥
मुक्ताई जीवन्मुक्त
हा संसार । हरि पारावार
केला आम्हीं ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

आधी तूं मुक्तचि होतासिरे प्राणीया
। परि वासनें पापिणीया नाडिलासी ।
आधींचे आठवीं मग घेई परी ।
हरिनाम जिव्हारीं मंत्रसार ॥ १ ॥
आदि मध्य हरि ऊर्ध्व पै वैकुंठ ।
जाईल वासना हरि होईल प्रगट ॥ ध्रु० ॥
एकतत्त्व धरी हरिनाम गोड । येर तें काबाड विषय ओढी ।
नाम पैं सांडी वासना पापिणी । एक नारायणीं चाड धरी ॥ २ ॥
मुक्ताई मुक्तलग सांडिली वासना ।
मुक्तामुक्ती राणा हरिपाठें ।
नामाचेनि घोटें जळती पापराशी
। न येती गर्भवासी अरे जाना ॥ ३ ॥



# संत मुक्ताबाई

आदि मध्य ऊर्ध्व मुक्त भक्त हरि । सबाह्य अभ्यंतरी हरि एकु ॥ १ ॥
नलगती तीर्थं हरिरूपें मुक्त । अवघेंचि सूक्त जपिनिलें ॥ २ ॥
ज्याचेनि नामें मुक्त पैं जडमूढ । तरले दगड समुद्रीं देखा ॥ ३ ॥
मुक्ताई हरिनामें सर्वदां पै मुक्त । नाहीं आदि अंत उरला आम्हां ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

अलिप्त संसारी हरिनामपाठें । जाईजे
वैकुंठे मुक्तलग ॥ १ ॥
हरिविण मुक्त न करि हो सर्वदां ।
संसारआपदा भाव तोडी ॥ २ ॥
आशेच्या निराशीं अचेतना मारी ।
चेतविला हरि आप आपरूपें ॥ ३ ॥
मुक्ताई जीवन्मुक्तची
सर्वदां । अभिन्नव
भेदा भेदियेलें ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

सर्वी सर्व सुख अहं तेचि दुःख । मोहममता
विष त्यजीयेलें ॥ १ ॥
साधक बाधक करुनि
विवेक । मति मार्ग तर्क शोधियेला ॥ २ ॥
सर्वतीर्थ हरि दुभाळु धनुवो । वोळला कणवा चातकाचा ॥ ३ ॥
सूक्ष्ममार्ग त्याचा भक्त देहीं मायेचा ।
आकळावयाचा सत्व धरीं ॥ ४ ॥
वेद जंव वाणी श्रुति तुपें काहाणी । ऐको
जाय कर्णीं तंव परता जाय ॥ ५ ॥
मुक्ताई सोहंभावें भरले दिसे
देवें । मूर्तामूर्त सोहंभावे हरि घोटी ॥ ६ ॥

# संत मुक्ताबाई



भजनभावो देहीं नित्यनाम पेठा । नामेंचि
वैकुंठा गणिका गेली ॥ १ ॥
नाममंत्र आम्हां हरिरामकृष्ण । दिननिशी
प्रश्न मुक्तिमार्गु ॥ २ ॥
नामचि तारकु तरले
भवसिंधु । हरिनामछंदु मंत्रसार ॥ ३ ॥
मुक्ताई चिंतनीं हरिप्रेम
पोटी । नित्य नाम घोटी
अमृत सदां ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

सर्व रूपीं निर्गुण संचलें पैं
सर्वदा । आकार संपदा
नाहीं तया ॥ १ ॥
आकारिती भक्त मायामय
काम । सर्वत्र निःसीम
अंतरी आहे ॥ २ ॥
निवृत्तीचा उच्छेदु निवृत्ति तत्त्वता
। सर्वही समता सांगितली ॥ ३ ॥
मुक्ताई अविट मुक्तपंथरत
। जीवीं शिवीं अनंत तत्त्वविद ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

परब्रह्मीं चित्त निरंतर धंदा । तया नाहीं कदा गर्भवास ॥ १ ॥
उपजोनी जनीं धन्य ते योनी । चित्त नारायणीं मुक्तलग ॥ २ ॥
अव्यक्ती पैं व्यक्ति चित्तासि अनुभव । सर्व सर्वीं देव भरला दिसे ॥ ३ ॥
ज्ञेय ज्ञाता ज्ञान उन्मनी विज्ञान । चित्त नारायण झालें त्याचें ॥ ४ ॥
आदि अंतीं हरि सर्व त्याचा जाला । परतोनि अबोला प्रपंचेसी ॥ ५ ॥
मुक्ताईचें चित्त निरंतर मुक्त । हरि हेंचि संचित आम्हांघरीं ॥ ६ ॥



# संत मुक्ताबाई

अविट हे न विटे हरिचे हे गुण । सर्व सनातन

ध्यातां रूपें ॥ १ ॥

साध्य हें साधन हरिरूपें ध्यान ।

रामकृष्णकीर्तन मुक्त आम्हीं ॥ २ ॥

असंगेंचि नटु नटलों

पैं साचे । नाहीं त्या यमाचें

भय आम्हां ॥ ३ ॥

मुक्तता पूर्णता मुक्ताई

साधिली । साधना दिधली चांगयासी ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

देऊळींचा देवो घरभरी भावो । कळसेवीण

वावो जातु असे ॥ १ ॥

जाताती वाउगे नटनाट्यसोंगें । चित्तअनुरागें

भजतीना ॥ २ ॥

असोनि न दिसे उगयाचि पिसें । घेती

वायां वसे सज्जनेवीण ॥ ३ ॥

रावोरंक कोहं न म्हणेचि सोहं ।

साकारलें आहम् न कळे तया ॥ ४ ॥

भ्रांतीचेनि भूली वायाचि घरकुली । माया

आड ठेली अरे रया ॥ ५ ॥

मुक्ताई परेसी दुभतें

चहूसी । सत्रावी सर्वरसीं एका देवें ॥ ६ ॥



# संत मुक्ताबाई

नादाबिंदा भेटी जे वेळीं पैं
जाली । ऐशी एके बोली
बोलती जीव ॥ १ ॥
उगेंचि मोहन धरूनि प्रपंची ।
त्यासी पै यमाची नगरी आहे ॥ २ ॥
जीव जंतु जड त्यासी उपदेशी
। त्यासी गर्भवासीं
घाली देवो ॥ ३ ॥
मुक्ताई श्रीहरि उपदेशी निवृत्ति
। संसार पुढती नाहीं आम्हां ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

पूजा पूज्य वित्तें पूजक पै चित्ते। घाली दंडवतें

भाव शीळ ॥ १ ॥

चंपक सुमनें पूजी

कातळीने । धूप दिप मनें मानसिक ॥ २ ॥

भावतीत भावो वोगरी

अरावो । पाहुणा पंढरीरावो

हरि माझा ॥ ३ ॥

मुक्ताई संपन्न विस्तारूनि

अन्न । सेवी नारायण हरि माझा ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



प्रकृति निर्गुण प्रकृति सगुण । दीपें
दीप पूर्ण एका तत्त्वें ॥ १ ॥
देखिलेंगे माये पंढरिपाटणीं
। पुंडलिका आंगणी विठ्ठलराज ॥ २ ॥
विज्ञानेंसी तेज सज्ञानेसी
निज । निर्गुणेंसी चोज केलें सयें ॥ ३ ॥
मुक्ताई तारक सम्यक
विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ
दाखविलें ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



उर्णाचिया गळां बांधली
दोरी । पाहो जाय घरीं तंव तंतु
नाहीं ॥ १ ॥
तैसें झालें बाई जंव एकतत्त्व
नाहीं । दुजी जंव साई तंव हें अंध ॥ २ ॥
ऐसी मी हो अंध
जात होतें वायां । प्रकृति सावया
पावली तेथें ॥ ३ ॥
मुक्ताई सावध करी निवृत्तिराज । हरिप्रेमें
उमज एकतत्त्वें ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

मुक्त पैं अखंड त्यासि पैं फावलें । मुक्तचि घडलें हरिच्या पाठें ॥ १ ॥

रामकृष्णें मुक्त जाले पैं अनंत । तारले पतीत युगायुगीं ॥ २ ॥

कृष्णनामें जीव झाले सदा शिव । वैकुंठ राणिव मुक्त सदां ॥ ३ ॥

मुक्ताई संजीवन मुक्तमुक्ति कोडे । जालें पैं निवाडें हरिरूप ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

विश्रांति मनाची निजशांति
साची । मग त्या
यमाची भेटी नाहीं ॥ १ ॥
अधिकारी मन मग
सारी स्नान । रोकडेंचे साधन
आलें हाता ॥ २ ॥
साधिलें साधन नित्य अनुष्ठान । चित्तीं
नारायणमंत्र जपे ॥ ३ ॥
मुक्ताई प्रवीण नारायण धन । नित्य मंत्र
स्नान करीं वेगीं ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

नामबळें देहीं असोनि मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनें ॥ १ ॥

दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥ २ ॥

माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नामपाठें ॥ ३ ॥

मुक्ताईचें धन हरिनामें उच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



अंतर बाह्य निकें सर्व इंद्रियांचे
चोज । निजीं निजबीज
एकतत्त्व ॥ १ ॥
आदि नाहीं अनादि नाहीं
। तें रूप पाही अविट
बाईये ॥ २ ॥
मुक्ताई संजीवन तत्त्वता
निर्गुण । आकार सगुण
प्रपंचींचा ॥ ३ ॥

# संत मुक्ताबाई



उजियेडु कोडें घेतलो निवाडें । आपुलिये चाडे जीवनकळा ॥ १ ॥
एकरूप दिसे सर्वांघटीं भासे । एक ह्रषिकेशें व्यापियेलें ॥ २ ॥
त्रिपुटि भेदुनी सर्वत्रगामिनी । एका रूपें मोहिनी तेही सदां ॥ ३ ॥
नित्यता उन्मत्त अवघेचि भरित । एकतत्त्वें दावित सोहं भावें ॥ ४ ॥
मुक्ताई सांगती कैसेनि गुंपती । मायादेवी समाप्ति निजतत्त्वीं ॥ ५ ॥



# संत मुक्ताबाई

मुक्तपणें ब्रीद
बांधोनियां द्विज । नेणती
ते बीज केशव हरी ॥ १ ॥
ज्याचेनि मुक्तता
सर्वही पै मुक्त । करुनियां
रत न सेविती ॥ २ ॥
वेदीं बोलियेले ब्रह्मार्पणभावें
। सदा मुक्त व्हावें अरे जना ॥ ३ ॥
मुक्ताई मुक्त हरिनाम सेवित ।
अवघेचि मुक्त सेवितां हरी ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

अखंड जयाला देवाचा शेजार ।
कारे अहंकार नाही गेला ।।
मान अपमान वाढविसी हेवा ।
दिवस असता दिवा हाती घेसी ।
परब्रह्मासंगे नित्य तुझा खेळ ।
आंधळ्याचे डोहाळे का बा झाले ।
कल्पतरू तळवटी इच्छिती ते गोष्टी ।
अद्यापि नरोटी राहिली का ।
घरी कामधेनु ताक मागू जाय ।
ऐसा द्वाड आहे जगा माजी ।
म्हणे मुक्ताबाई जाई ना दर्शना ।
आधी अभिमाना दूर करा।।



# संत मुक्ताबाई

मुक्तपणे अखंड त्यासी पै फावले ।
मुक्तची घडले हरीच्या पाठी ।
रामकृष्णे मुक्त जाले पै अनंता ।
तरले पतीत युगायुगी ।
कृष्णनामे जीव सदा झाले शिव ।
वैकुंठ राणिव मुक्त सदा ।
मुक्ताई संजीवन
मुक्तमुक्ती कोठे ।
जाल पै निवाडे हरिरूप ।



संत मुक्ताबाई

मुंगी उडाली आकाशीं
। तिणें गिळीलें सूर्याशीं ॥ १ ॥
थोर नवलाव जाहला । वांझे पुत्र
प्रसवला ॥ २ ॥
विंचु पाताळाशी जाय । शेष
माथां वंदी पाय ॥ ३ ॥
माशी व्याली घार
झाली । देखोन मुक्ताई
हांसली ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

शुद्ध ज्याचा भाव झाला
। दुरी नाही देव त्याला ।
अवघी साधन हातवटी । मोले
मिळत नाही हाटी ।
कोणी कोणा शिकवावे । सारे
शोधुनिया घ्यावे ।।
लडिवाळ मुक्ताबाई
। जीव मुद्दल ठायीचे ठायी ।
तुम्ही तरुनी विश्वतारा
। ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।



# संत मुक्ताबाई

देउळाच्या कळशीं नांदे एक ऋषी । तया घातली पुशी योगेश्वरीं ॥ १ ॥
दिवसा चांदिणें रात्रीं पडे उष्ण । कैसेंनी कठिण तत्त्व जालें ॥ २ ॥
ऋषी म्हणे चापेकळिकाळ पैं कांपे । प्रकाश पिसे मनाच्या धारसे एक होय ॥ ३ ॥
एकट एकलें वायांचि पै गुंफलें । मुक्त पैं विठ्ठलें सहज असे ॥ ४ ॥
वैकुंठ अविट असोनि प्रकट । वायांचि आडवाट मुक्ताई म्हणे ॥ ५ ॥



# संत मुक्ताबाई

वाहवा साहेबजी । सद्गुरुलाल गुसाईजी
लाल बीज मो उदीला काला, औठ

पिठसो निला ।

पीत उन्मनी भ्रमर गुंफा रस झुला बाला ।
सहस्त्र दल मो अलख लिखाये,

आज लौ परमाना ।

जहां तहा साधू, दसवा आप ठिकाना ।
सदगुरु चेले दोनो बराबर,

येक देशमो भाई ।

एकसे ऐसे दरसन पायो महाराज मुक्ताई ।

# संत मुक्ताबाई



प्रारब्ध संचित आचरण गोमटें ।
निवृत्तितटाकें निघालो आम्ही ॥ १ ॥
मुळींचा पदार्थ मुळींच पैं
गेला । परतोनि अबोला संसारासी ॥ २ ॥
सत्यमिथाभाव सत्वर फळला
। ह्रदयीं सामावला हरिराज ॥ ३ ॥
अव्यक्त आकार साकार हे
स्फुर्ति । जीवेशिवें
प्राप्ति ऐसें केलें ॥ ४ ॥
सकामनिष्कामवृत्तीचा
निजफेर । वैकुंठाकार दाखविलें ॥ ५ ॥
मुक्तलग मुक्त मुक्ताईचें तट । अवघेचि
वैकुंठ निघोट रया ॥ ६ ॥



# संत मुक्ताबाई

मुक्तलग चित्तें मुक्त पै सर्वदां ।
रामकृष्ण गोविंदा
वाचें नित्य ॥ १ ॥
हरिहरिछंदु तोडी भवकंदु
। नित्य नामानंदु जपे रया ॥ २ ॥
सर्वत्र रूपडें भरलेंसे
दृश्य । ज्ञाता ज्ञेय भासे
हरिमाजी ॥ ३ ॥
मुक्ताई सधन हरी रूप चित्तीं ।
संसारसमाप्ति हरिच्या नामें ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

शांति क्षमा वसे देहीं देव पैसे । चित्त
समरसें मुक्त मेळु ॥ १ ॥
निर्गुणें उपरमु देव
पुरुषोत्तमु । प्रकृति
संगमु चेतनेचा ॥ २ ॥
सज्ञानीं दिवटा अज्ञानी तो पैठा ।
निवृत्तीच्या तटा नेतु भक्ता ॥ ३ ॥
मुक्ताई दिवस अवघा
हृषीकेश । केशवेंविण
वास शून्य पैसे ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



पूर्णपणें सार अविट
आचार । सारासार
विचार निजतेजें ॥ १ ॥
निर्गुणीं आकार सर्वत्र
साकार । एकरूपें विचार
निजतेजें ॥ २ ॥
मुक्ताई चैतन्य उवघेंचि धन । आदि
अंतु खुण निवृतीची ॥ ३ ॥



# संत मुक्ताबाई

मुक्तलग चित्तें मुक्त पै सर्वदां ।
रामकृष्ण गोविंदा
वाचें नित्य ॥ १ ॥
हरिहरिछंदु तोडी भवकंदु
। नित्य नामानंदु जपे रया ॥ २ ॥
सर्वत्र रूपडें भरलेंसे
दृश्य । ज्ञाता ज्ञेय भासे
हरिमाजी ॥ ३ ॥
मुक्ताई सधन हरी रूप चित्तीं ।
संसारसमाप्ति हरिच्या नामें ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

दिवसा शीतळ निशीयेसी बरळ ।
अधऊर्ध्व केवळ निजबीज ॥ १ ॥
या आदि नाहीं अनादिही नाहीं । कैचा
मोहप्रवाहीं दिसेचिना ॥ २ ॥
शक्तीचे संपुष्टीं मुक्ता
मुक्त घट । अवघे वैकुंठ
दिसताहे ॥ ३ ॥
मुक्ताई परिपाक
अवघे रूप एक । देखिलें
सम्यक सोहं भावें ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



मुक्तजीव सदा होति पै नामपाठें
। तेंचि रूप ईटे देखिलें आम्ही ॥ १ ॥
पुंडलिकें विठ्ठल आणिला
पंढरी । आणूनि लवकरी तारी जन ॥ २ ॥
ऐसें पुण्य केलें एका
पुंडलिकेंची । निरसिली जनाची
भ्रमभुली ॥ ३ ॥
मुक्ताई चिंतनें मुक्त पैं
जाली । चरणीं समरसली हरिपाठें ॥ ४ ॥



संत मुक्ताबाई

दिवसा शीतळ निशीयेसी बरळ ।
अधऊर्ध्व केवळ निजबीज ॥ १ ॥
या आदि नाहीं अनादिही नाहीं । कैचा
मोहप्रवाहीं दिसेचिना ॥ २ ॥
शक्तीचे संपुष्टीं मुक्ता
मुक्त घट । अवघे वैकुंठ
दिसताहे ॥ ३ ॥
मुक्ताई परिपाक
अवघे रूप एक । देखिलें
सम्यक सोहं भावें ॥ ४ ॥

# संत मुक्ताबाई



आदि मध्य ऊर्ध्व मुक्त भक्त हरि । सबाह्य अभ्यंतरी हरि एकु ॥ १ ॥
नलगती तीर्थं हरिरूपें मुक्त । अवघेंचि सूक्त जपिनिलें ॥ २ ॥
ज्याचेनि नामें मुक्त पैं जडमूढ । तरले दगड समुद्रीं देखा ॥ ३ ॥
मुक्ताई हरिनामें सर्वदां पै मुक्त । नाहीं आदि अंत उरला आम्हां ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

सर्व रूपीं निर्गुण संचलें पैं सर्वदा । आकार संपदा नाहीं तया ॥ १ ॥

आकारिती भक्त मायामय काम । सर्वत्र निःसीम अंतरी आहे ॥ २ ॥

निवृत्तीचा उच्छेदु निवृत्ति तत्त्वता । सर्वही समता सांगितली ॥ ३ ॥

मुक्ताई अविट मुक्तपंथरत । जीवीं शिवीं अनंत तत्त्वविद ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

मनें मन चोरी मनोमय
धरी । कुंडली आधारी सहस्त्रकारी ॥ १ ॥
मन हें वोगरु आदि
हरिहरु । करी पाहुणेरु आदिरूपा ॥ २ ॥
सविया विसरु घेसील
पडिभरु । गुरुकृपा विरु विरे सदां ॥ ३ ॥
मुक्ता मुक्तचित्तें
गुरुमार्ग विते । पावन त्वरिते
भवीं भाव ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

व्यक्त अव्यक्तीचें
रूपस मोहाचें । एकतत्त्व दीपाचें
हृदयीं नादें ॥ १ ॥
चांगया फावलें फावोनी घेतलें ।
निवृत्तीनें दिधलें आमुच्या करीं ॥ २ ॥
आदि मध्य यासी
सर्वत्रनिवासी । एक रूपें निशी दवडितु ॥ ३ ॥
मुक्ताई पूर्णता एकरूपें चिता । आदि
अंतु कथा सांडियेली ॥ ४ ॥



संत मुक्ताबाई

सहस्त्रदळीं दळीं हरि आत्मा
हा कुसरी । नांदे देहा
भीतरीं अलिप्त सदां ॥ १ ॥
रविबिंब बिंबे घटमठीं
सदा । तें नातळे पै कदां तैसे आम्हा ॥ २ ॥
अलिप्त श्रीहरि सेवी का झडकरी
। सेवितां झडकरी हरिच होआल ॥ ३ ॥
चंदनाच्या दृतीं वेधल्या वनस्पती । तैंसे आहे
संगतीं या हरिपाठें ॥ ४ ॥
मुक्ताई चिंतित
चिंतामणी चित्तीं । इच्छिलें पावती
भक्ता सदां ॥ ५ ॥



# संत मुक्ताबाई

करणें जंव कांही करूं जाये
शेवट । तंव पडे आडवाटें द्वैतभावें ॥ १ ॥
राहिलें करणें नचलें पैं कर्म । हरिविण
देहधर्म चुकताहे ॥ २ ॥
मोक्षालागीं उपाय करितोसि
नाना । तंव साधनी परता
पडो पाहे ॥ ३ ॥
मुक्ताई करि हरि
श्रवण पाठ । तेणें मोक्षमार्ग
नीट सकळ साधे ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

चितासी व्यापक व्यापूनि दुरी ।
तेंचि माजी घरीं नांदे सदा ॥ १ ॥
दिसे मध्य सुख मुक्तलग
हरी । शांति वसे घरीं
सदोदित ॥ २ ॥
नाहीं या शेवट अवघाचि निघोट ।
गुरुतत्त्वें वाट चैतन्याची ॥ ३ ॥
मुक्ताई संपन्न मुक्त पैं
सेजुले । सर्वत्र उभविलें
मुक्ति चोख ॥ ४ ॥



# संत मुक्ताबाई

निर्गुणाची सैज सगुणाची
बाज । तेथें केशीराज पहुडले ॥ १ ॥
कैसे याचें करणें दिवसां चांदिणे
। सावळें उठणें एका तत्त्वें ॥ २ ॥
नाहीं या ममता
अवघीच समता । आदि
अंतु बिंबतां नलगे वेळू ॥ ३ ॥
मुक्ताई सधन सर्वत्र
नारायण । जीव शिव संपूर्ण
एकतत्त्वें ॥ ४ ॥



संत मुक्ताबाई